**महसूल विभागाच्या अधिपत्याखालील “गट-अ” मधील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना व बदल्या याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
### शासन निर्णय क्रमांकः टिआरएफ २०१४/०२/प्र.क्र.३१/ई-१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख: २२ जून , २०१५

**वाचा :-** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दिनांक ३१ जानेवारी २०१४

२) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/का.१२, दि.२८.४.२०१५

**शासन निर्णय**

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटिशन (सिव्हील) क्र. ८२/२०११ मध्ये दिलेल्या निर्देशाचे पालन करण्यासाठी, शासन सेवेतील गट -अ॰, गट -ब॰ व गट -क॰ मधील अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या पदस्थापना आणि बदल्यांबाबत शिफारशी करण्यासाठी विभागनिहाय नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याचा निर्णय संदर्भाधीन शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे.

२. उपरोक्त शासन निर्णयान्वये दिलेल्या सुचनांप्रमाणे महसूल विभागाच्या आधिपत्याखालील गट -अ॰ मधील :-

१) अपर जिल्हाधिकारी / निवडश्रेणी अपरजिल्हाधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना तसेच महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार करावयाच्या त्यांच्या बदल्यांबाबत सक्षम प्राधिकाऱ्यांना शिफारशी करण्यासाठी,तसेच,

२) उपजिल्हाधिकारी/निवडश्रेणी उपजिल्हाधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना तसेच महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ मधील कलम ४(४) व ४(५) च्या तरतुदीनुसार करावयाच्या अनियतकालीक व मुदतपूर्व बदल्या तसेच विभागबाहय बदल्यांच्या संदर्भात आणि प्रतिनियुक्तीवरील नियुक्तीसाठी सक्षम प्राधिकाऱ्यांना शिफारशी करण्यासाठी,

खालीलप्रमाणे नागरी सेवा मंडळ स्थापन करण्यात येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव | अध्यक्ष |
| २. | सचिव (वने) / सचिव (मदत व पुनर्वसन) यापैकी ज्येष्ठ सचिव | सदस्य |
| ३. | आदिवासी विकास विभागाचे सह सचिव / उप सचिव (आस्थापना) | सदस्य |
| ४. | सह सचिव / उप सचिव, महसूल (आस्थापना), महसूल व वन विभाग | सदस्य सचिव |

३. उपजिल्हाधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांच्या विभागांतर्गत नियतकालीक बदल्यांबाबत सक्षम प्राधिकाऱ्यांना (विभागीय आयुक्त यांना) शिफारशी करण्यासाठी विभागीय स्तरावर स्वतंत्र नागरी सेवा मंडळ अस्तित्वात राहील.

४. सर्व संबंधित कार्यासनांनी, अपर जिल्हाधिकारी/उपजिल्हाधिकारी या पदांवर अधिकाऱ्यांची पदोन्नतीने/सरळसेवेने नियुक्तीसाठी सक्षम प्राधिकाऱ्यांनी विभागीय संवर्ग वाटप अंतिम केल्यावर त्या यादीतील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेचे प्रस्ताव, तसेच बदल्यां आणि प्रतिनियुक्तीबाबतचे प्रस्ताव, संदर्भातील अ.क्र. २ येथे नमूद दिनांक २८.०४.२०१५ च्या शासन अधिसूचनेतील सूचना व महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ मधील तरतुदींनुसार, नागरी सेवा मंडळास सादर करावेत. नागरी सेवा मंडळाकडून शिफारस प्राप्त झाल्यावर सदर प्रस्ताव मान्यतेसाठी संदर्भाधीन शासन निर्णयातील सुचनांप्रमाणे सक्षम प्राधिकाऱ्यास सादर करण्यात येतील.

५. हे आदेश तात्काळ अंमलात येत असून त्याची काटेकोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

६. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२२१३०७४२३९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madhav Narayan Kale

Digitally signed by Madhav Narayan Kale
DN: CN = Madhav Narayan Kale, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2015.06.22 13:14:59 +05'30'

**( माधव काळे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२,

२. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
३. मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
४. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
५. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
६. सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०००३२,
७. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
८. सर्व विभागीय आयुक्त.
९. उप सचिव, ई-१ यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
१०. उप सचिव, ई-३, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई - ४०००३२,
११. कार्यासन अधिकारी, ई-१(अ) ई-२, ई-३, ई-६, ई-७, ई-९ व ई-१० महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
१२. निवडनस्ती, ई-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२